GR-20040807125741001

इंदिरा आवास योजना
घरकुलाची संयुक्त मालकी.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**

**शासन परिपत्रक क्रमांक इआयो-1094/प्र-81/जल-17,**

**मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 13 सप्टेंबर 1994.**

**वाचा :-** शासन परिपत्रक, नियोजन विभाग क्रमांक जरोयो-1490/प्र.420/जरोयो-4, दिनांक 3 मे 1990.

**शासन परिपत्रक :-** महाराष्ट्र शासनाने महिलांसंबंधी धोरण जाहीर केले. यात शासनाच्या मालमत्तेमधून प्रदान करण्यात येणारी घरे/जमिनी/भाडेपट्टे, इत्यादी पती-पत्नीच्या संयुक्त नावे दिली जातील व लाभधारक अविवाहित असेल तर लग्नानंतर आपोआप सहलाभधारक होईल अशी अट घालण्यात येईल असे विहित करण्यात आले आहे.

2. इंदिरा आयास योजनेखाली बांधण्यात येणारी घरे पती-पत्नीच्या संयुक्त नावे द्यावीत असे केंद्र शासनाने अगोदरच निर्देशित केले असून त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येत आहे. ही बाब विचारात घेऊन शासन असे आदेश देत आहे की, यापुढे इंदिरा आवास योजनेखालील लाभधारक अविवाहित असल्यास त्यास घरे मंजूर करताना मंजुरीच्या आदेशात त्याचे लग्नानंतर त्याची पत्नी आपोआप सहलाभार्थी होईल अशी अट घालण्यात यावी.

3. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांना विनंती करण्यात येते की, वरील आदेश सर्व संबंधितांच्या नजरेस आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

द.वि. साखळकर,
कक्ष अधिकारी.

प्रति

मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
मुख्य सचिव,
सचिव, महिला व बालकल्याण विभाग,
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (ग्रा.वि.)/उप सचिव (श्री. बन्सोड),
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
जनजाती आयुक्त, नाशिक,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व गट विकास अधिकारी,
लेखाधिकारी, जल-19 व जल-22,
कक्ष अधिकारी, जल-15, जल-16, जल-18, जल-21,
निवड नस्ती.